जादुटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणीसाठी समन्वय अधिकारी नियुक्त करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

## शासन निर्णय क्र.: अंश्रनि-२०२०/प्र.क्र. १८१/सामासु

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : २८ मार्च, २०२२

<u>वाचा:</u> (१) महाराष्ट्र नरबळी आणि इतर अमानुष, अनिष्ट व अघोरी प्रथा व जादुटोणा यांना प्रतिबंध घालण्याबाबत व त्यांचे समुळ उच्चाटन करण्याबाबत अधिनियम-२०१३.

(२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.०८/समन्वय, दि. २ मार्च, २०२२.

<u>प्रस्तावना :</u>

महाराष्ट्र नरबळी आणि इतर अमानुष, अनिष्ट व अघोरी प्रथा व जादुटोणा यांना प्रतिबंध घालण्याबाबत व त्यांचे समुळ उच्चाटन करण्याबाबत अधिनियम-२०१३ दि ३० डिसेंबर, २०१३ रोजी जारी केलेला आहे. सदर कायद्याची परिणामकारक व योग्य अंमलबजावणी करण्यासाठी मा. मंत्री (सामाजिक न्याय) यांच्या अध्यक्षतेखाली जादुटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणी समितीची (Programme Implementation and Monitoring Committee PIMC) संदर्भाधीन दि. २ मार्च, २०२२ च्या शासन निर्णयान्वये पुनर्रचना करण्यात आली आहे.

जादुटोणा विरोधी कायदा प्रभावीपणे राबविण्याबाबत मा. उपमुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली त्यांच्या दालनात मंगळवार दि. ७ डिसेंबर, २०२१ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीमध्ये मा.उप मुख्यमंत्री महोदयांनी दिलेल्या निर्देशानुसार, मंत्रालयीन स्तरावर संबंधित विभागांच्या उप सचिव/सह सचिव स्तरावरील अधिकारी यांची जादुटोणा कायद्याच्या अंमलबजावणीसाठी समन्वय अधिकारी (नोडल अधिकारी) म्हणून नियुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

जादुटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणीसाठी संबंधित पुढील नमूद मंत्रालयीन विभागांचे सह सचिव/ उप सचिव यांची समन्वय अधिकारी (नोडल अधिकारी) म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ.क्र. | समन्वय अधिकारी |
|---|---|
| १ | सह सचिव/उप सचिव (आस्थापना), गृह विभाग |
| २. | सह सचिव/उप सचिव (आस्थापना), माहिती व जनसंपर्क |
| ३. | सह सचिव/उप सचिव (आस्थापना), विधी व न्याय विभाग |
| ४. | सह सचिव/उप सचिव (आस्थापना), वित्त विभाग |

| | |
|---|---|
| ५. | सह सचिव/उप सचिव (आस्थापना), महसूल विभाग |
| ६. | सह सचिव/उप सचिव (आस्थापना), आदिवासी विकास विभाग |
| ७. | सह सचिव/उप सचिव (आस्थापना), उच्च व तंत्र शिक्षण विभाग |
| ८. | सह सचिव/उप सचिव (आस्थापना), वैद्यकीय शिक्षण विभाग |
| ९. | सह सचिव/उप सचिव (आस्थापना), ग्राम विकास विभाग |
| १०. | सह सचिव/उप सचिव (आस्थापना), सांस्कृतिक कार्य विभाग |
| ११. | सह सचिव/उप सचिव (आस्थापना), महिला व बाल कल्याण विभाग |
| १२ | सह सचिव/उप सचिव (आस्थापना), सार्वजनिक आरोग्य विभाग |
| १३ | सह सचिव/उप सचिव (आस्थापना) , शालेय शिक्षण व क्रीडा विभाग |
| १४. | सह सचिव/उप सचिव (आस्थापना/सामासु), सामाजिक न्याय विभाग |

२. जादुटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणी समितीचे सह अध्यक्ष हे जादुटोणा विरोधी कायद्याच्या अनुषंगाने कामास गती प्राप्त होण्यासाठी वरीलप्रमाणे नियुक्त समन्वय अधिकारी यांच्याशी संपर्क/संवाद साधतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०३२९१२२८३५७५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

RAJENDRA
NATHA SAVANE

Digitally signed by RAJENDRA NATHA SAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a2ac5ab6ca0075cc776c90ec03925f2eb8727640eacf311beb6f68d63939303, pseudonym=AE89A440549540E82C5C3FE007D468E20DCA5112, serialNumber=F049989DBBEF93340E9EDD88AF960A0963746D42BAA5C948405B62E821529A99, cn=RAJENDRA NATHA SAVANE
Date: 2022.03.29 12:32:43 +05'30'

(रा. ना. सवने)

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव

२) मा. मंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव

३) मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय) यांचे स्वीय सहाय्यक

४) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई

५) अप्पर मुख्य सचिव (सा.न्या.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई

६) अ.मु.स./प्रधान सचिव / सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग), मुंबई

७) आयुक्त, समाजकल्याण, पुणे

८) सर्व विभागीय आयुक्त

९) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.